"पांढरी चिप्पी (*Sonneratia alba*)" ह्या
कांदळवन वृक्षास "राज्य कांदळवन वृक्ष"
म्हणून घोषित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी ०९२०/प्र.क्र.१५९/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक. २२ सप्टेंबर, २०२०.

**वाचा :-**

१. मुख्य वन्यजीव रक्षक तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडील पत्र क्र. कक्ष-२२(८)/वजी/प्र.क्र.३६(१९-२०)/२०३५, दिनांक २२ ऑगस्ट, २०१९.
२. राज्य वन्यजीव मंडळाच्या १५ व्या बैठकीचा मान्यताप्राप्त कार्यवृत्तांत पत्र क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०७२०/प्र.क्र.९३/फ-१, दिनांक ०९ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात राज्य प्राणी, राज्य पक्षी, राज्य वृक्ष, राज्य फूल व राज्य फुलपाखरु अशी राज्य मानचिन्हे आहेत. तथापि, देशात कोणत्याही राज्याने "राज्य कांदळवन वृक्ष" घोषित केलेला नाही. त्यामुळे "राज्य कांदळवन वृक्ष" घोषित करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. महाराष्ट्र राज्यास ७२० कि.मी. समुद्र किनारा लाभला आहे. सागरी किना-यावरील असणारी कांदळवन वृक्ष ही वैशिष्टयपूर्ण वृक्ष प्रजाती आहे. महाराष्ट्रात कांदळ वृक्षाच्या २० प्रजाती आढळतात. कांदळवने समुद्र किना-यांचे लाटांपासून तसेच त्सुनामीसारख्या नैसर्गिक आपत्तीपासून रक्षण करतात. अनेक समुद्री प्रजातीचे प्रजनन कांदळवन क्षेत्रात होत असते. कार्बन संचयनाच्या दृष्टीनेही कांदळवनाचे अतिशय महत्व आहे. महाराष्ट्र राज्याने कांदळवनाचे महत्व जाणून सन २०१२ मध्ये स्वतंत्र कांदळवन कक्ष स्थापन केला आहे.

सोनेरेशिया अल्बा हा कांदळवन वृक्ष स्थानिकरित्या पांढरी चिप्पी म्हणून ओळखला जातो. हा वृक्ष दुर्मिळ नसला तरी महाराष्ट्राच्या समुद्र किना-यावर सर्वदूर आढळतो. पांढ-या चिप्पीची फुले सुगंधी असून मधमाशा, कीटक व पक्षांना आकर्षित करतात. पांढरी चिप्पी आणि पर्यायाने कांदळवन वृक्षाबाबत विद्यार्थी, सर्वसामान्य जनता ह्यांना माहिती व्हावी, त्यांचे महत्व समजावे, जेणेकरुन कांदळवनाच्या संरक्षण, संवर्धनात सर्वसामान्यांचा पाठिंबा मिळावा, ह्या दृष्टीने पांढरी चिप्पी ह्या वृक्षास कांदळवन कक्ष तसेच मुख्य वन्यजीव रक्षक ह्यांनी "राज्य कांदळवन वृक्ष" म्हणून घोषित करण्याचे प्रस्तावित केले आहे. त्यानुसार राज्य वन्यजीव मंडळाने पांढरी चिप्पी (Sonneratia alba) या कांदळवन वृक्षास "राज्य कांदळवन वृक्ष" म्हणून घोषित करण्यास मान्यता प्रदान केली आहे.

**शासन निर्णय :-**

तद्नुसार महाराष्ट्र शासन याव्दारे "पांढरी चिप्पी (Sonneratia alba)" या कांदळवन वृक्षास "राज्य कांदळवन वृक्ष" म्हणून घोषित करत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२२१५४८२८५९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.09.22 15:49:21 +05'30'

**(अरविंद आपटे)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

प्रत माहिती आणि उचित कार्यवाहीसाठी :-

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य प्रधान सचिव ( महसूल ),महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, (ग्राम विकास) ग्रामविकास व जलसंधारण विभाग , मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, पर्यावरण विभाग,मंत्रालय , मुंबई
१०) महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ, नागपूर.
१४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५) प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळ, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.
१७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( निसर्ग पर्यटन व वन्यजीव प्रशासन ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) नागपूर/मुंबई (बोरीवली).
१९) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व.
२०) सर्व वनसंरक्षक/उपवनसंरक्षक, (वन्यजीव).
२१) सर्व जिल्हाधिकारी.
२२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

२३) सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी.

२४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, पर्यटन विकास महामंडळ.

२५) उपवनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व.

२६) विभागीय वन अधिकारी सांगली/उस्मानाबाद/बीड / हिंगोली /चिपळूण.

२७) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी.

२८) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपूर.

२९) वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३०) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).